


**: संपर्क :**

ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे – ४००६०४

९८६९६७४८२०

**हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय
व प्रतिक्रियांसाठी**

netaksharee@gmail.com

सामान्य मी, सोशिक मी,

लढतो सदा, जगतो कमी,

हसतो उगा, जनरीत ही,

मी जगण्याची अशा या रीत टाकली

............ मी कात टाकली !!!!!!!!!!!!

नेटाक्षरीचा हा अंक अशाच विचारांसाठी, कवितांसाठी ज्यांनी जनरीत सोडुन एका नविन विचारधारेच्या दिशेने पाऊल टाकल आहे. जुन्या धोपट चालिरितींची , सवयींची बंधनं झुगारुन देऊन एक नविन श्वास, एक नवा जिव स्वत:मध्ये भरला आहे. वाचुया अशाच काही कविता.

................ शशिकांत रणवरे

(shashi_me.marathi@yahoo.com)

## टाकली मी कात आता!!!

जन्म गेले सात आता,
पेटणे ना वात आता!

दुश्मनीने पेटलेले,
रक्त सांगे जात आता!

शब्द जैसे ओरखाडे,
आप्त कैसे?...घात आता!

डुंबणारी नाव माझी,
ना सख्याचा हात आता!

स्वप्न सारी भंगलेली,
मिट्ट काळी रात आता!

गोठलेल्या जाणिवांनी,
मोडले मी आत आता!

काजव्यांची साथ कोठे,
मीच केली मात आता!

गांव मागे आठवांचा,
टाकली मी कात आता!

सुप्रिया जाधव ( पुणे)

supriya.jadhav7@gmail.com

## प्रयोग.

--------

कुण्ड्यांमधल्या सगळ्या झाडांवर

पेण्ट सांडलाय, पांढरा .

आता बुजतील रंध्रं सारी,

आणि अडेल श्वास !

दिसू लागलीच आहेत मलूल.

इमारतीला नवी झळाळी

आणणारा पेण्ट .....

काय अवस्था करतो झाडांची, नाही ?

का ? ती जिवंत असतात, म्हणून ?

इमारतीला नसतात का रंध्रं ?

आतला गदारोळ स्पंदत ठेवताना ----

पांढरी शुभ्र चकाकत रहाते, नाही ?

उद्यापासून -------

रंध्रांशिवाय श्वास घ्यायची

सवय करून पहायला हवी,

म्हणजे .......

साऱ्या भावना आत खदखदताना

चमकत राहीन बाहेरून .....

बघू तर खरं -----

जमतोय का नवा प्रयोग, ते ?

*प्रभा प्रभुदेसाई (चेन्नई)*

prabhapd@gmail.com

## दडपण, अस्तीत्व, झंजावात

~~~~~~~~~~~~~~~

*प्रवाहाविरुद्ध पोहशील तर*
*पाण्याच्या ओढीनं दुरवर फ़ेकला जाशील*
*म्हणून मळलेल्या मान्यताप्राप्त वाटा*
*मी चालाव्यात यासाठी सर्वांनी...*
*अगदी सर्वांनीच दडपण आणलं !!*

*मी हातात धरलेल्या दिशेच*
*तोंड त्यामूळे खूप हिरमूसल झालं*
*जणू आता मी तिला*
*टाकूनच जाणार आहे लांब कुठेतरी...!!*

*तिच्यातला एक उन्हकवडसा*
*हातात धरुन मी म्हटलं*
*"तू खंतावू नकोस,*
*अजून माझं काही निश्चित नाही" !!*

*माझ्याकडं अविश्वासानं*
*एक दृष्टी टाकत तिने त्या*
*मान्यताप्राप्त वाटांकडे पाहीलं*
*त्या एकदम हसल्याच मोकळेपणी !!*

*कारण.. त्यांच्यावर*
*कसलंही दडपण नव्हतंच,*
*त्यांच दडपण माझ्याच दिशेवर होत... !!*
*प्रश्न दडपणाचा होता की माझ्याच*
*अस्तिवाचा होता नक्की कळालंच नाही...*
*मान्यताप्राप्त दडपण कधी ढळलंच नाही !!*

*तिचा हात अलगद सोडवून*
*स्वतःला गर्तेच्या खाईत लोटताना*
*अचानक वाऱ्याचा एका प्रचंड*
*झोतानं मला परत डोगंरमाथ्यावर फ़ेकलं !!*
*कूणी त्याला सोसाट्याचा रानवारा,*
*तर कुणी बदलाचं वारं म्हणून संबोधल*
*निसर्गानंच पुनर्जिवित केललं हे झंजावात*
*आता कुणाच्या दडपणानं मुळीच शमणारं नव्हतं !!! -----*

*भुपेश कुंभार(नेदरलॅड्स)*

findbhupesh@gmail.com
~~~~~~~~~~~~~~~

# वसा

कुणा माहित काल होतो कसा?
मला मीच ना आठवे फारसा!!!

प्रवाहातल्या ओंडक्यासारखा
किती दुर वाहुन आलो असा

दगा देतसे सावलीही मला
भरोसा कुणाचा करावा कसा?

खुळ्या पावसाच्या वृथा वल्गना,
इथे कोरडा मी जसाच्या तसा!

खरा चेहरा दाखवु पाहता
चरे पाडले, फेकला आरसा

नकोसा जरी वाटला जन्म हा,
पुसावा कसा मीच माझा ठसा ?

उतुही नये जीव, मातु नये
फुलावा, फळावा असा दे वसा!!!

क्रांती सडेकर (नागपुर)

krantisadekar@gmail.com

## नवीन वाट माझी...............!!!!!!

नवीन वाट माझी दिशा नवी नवी
जागल्या डोळीयांना नवीन पालवी
नव्याची आसं मला, नव्याचे भास मला,
नव्याची प्यास वाटे हवी हवी

हवीशी हाक मला
नकोस देऊ.
शपथा-आसवांनी
नकोस ओढू.
सुटलंय दाव आता, बेभान धाव आता,
क्षितीज रेषा वाटे खुजी खुजी.

जुनं ते झालं गेलं
जुन्यात सोडलं.
जुनं ते सोनं सारं
मोडीत काढलं.
नव्यानं सुरवात, नव्याचा मुलुखात ,
लावली भाळी माझ्या माती नवी.

............... कौस्तुभ आपटे (मुंबई)

cowstubh_a@yahoo.com

# आता नको...............

घाव जखमांचे जुन्या सांभाळणे आता नको
त्याच त्या घटनांतुनी रेंगाळणे आता नको

व्हायचे होऊन गेले, राहिल्या खाणाखुणा
परतुनी मागील जखमा चाळणे आता नको

पेटलेल्या भावनांचाही निखारा शांतला
होमकुंडी या मनाला जाळणे आता नको

झेलले ग्रीष्मास, त्याचा खूप झाला दुखवटा
गंधवेड्या पावसाला टाळणे आता नको

तीच यमुना, तोच पावा, त्याच गाई, माधवा!
तेच राधेचे तुझ्यावर भाळणे आता नको..!

पापणीच्या आत काही, ओठ काही सांगती!
मुखवट्यांच्या भोवती घोटाळणे आता नको

सोयरे अन आप्त माझे, मोजण्या पुरते जरी
जन्मभर कौतूक त्यांचे पाळणे आता नको

पाहिले मी रंग त्यांचे बदलणारे रोजचे
बेगडी रंगास भुलणे, भाळणे आता नको

प्राजक्ता पटवर्धन (USA)

prajakta.j.patwardhan@gmail.com

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे. दर वेळी येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतोच. याच प्रोत्साहनाच्या बळावर आपण शतक गाठले आणि पुढला प्रवास अधिक जोशाने होत जाईल यात काही शंकाच नाही. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८५००० मराठी रसिकांना विनामुल्य वितरित केला जातो. या व्यतिरिक्त जुने अंक पहाण्यासाठी **www.esahity.com** या वेबसाईट वर व्हिजीट करणाऱ्यांची संख्या ही लक्षणीय आहे.हे अंक आपण ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करुन त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे.त्याच मेलची CC आम्हाला **netaksharee@gmail.com** दिल्यास आम्ही पुढचे अंक त्यांनां विनामुल्य पाठवत राहु. मराठीची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यात आपलाही हातभार लागावा असे कोणाला नाही वाटणार? आपल्यासारख्याच रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचा पल्ला पार करील हा विश्वास आहे.

: ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर प्रकाशने :

विनोदाचा दादा - ई-स्टाप, कवितांचा आवाज - स्वरनेटाक्षरी अल्बम,
मुलांचा नेट प्रवेश - बाल नेटाक्षरी, महाराष्ट्राच वैभव – दुर्ग दुर्गट भारी

## : प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके :

टल्लीची शाळा, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, मकरंदच्या त्रिवेण्या, मीरा (मराठी अनुवाद),
सावळ्या मुलीची गाणी, देशी दारुचे दुकान(3D), ओथंब, ओथंब२, मोरया, सईची वही,
लोकल गोष्टी, प्रियेचे अभंग, तो आणि ती, अहम् ब्रम्हास्मि,
मराठी कसे लिहावे(ई-शाळा), तॊ, ती आणि सिगरेट, एक होते राजे, आरंभ

वरील सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता
संपर्क : **esahity@gmail.com**

नेटाक्षरीचे अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता
संपर्क : **netaksharee@gmail.com**

**ई-साहित्य प्रतिष्ठानची आजवरची १३६ ई-प्रकाशने सीडीवर उपलब्द्ध**
**शतकोत्सव ५० रुपयात १३६ पुस्तके**
संपर्क : **9869674820**

# www.esahity.com